

# वोयटेक

## एक लष्करी अस्वल

(सत्यकथा)

गैरी पॉलिन

# वोयटेक

एक लष्करी अस्वल  (सत्यकथा)



गैरी पॉलिन
मराठी: पल्लवी

सप्टेंबर 1939 मध्ये जर्मनी आणि रशिया ने पोलंडवर आक्रमण केले. ग्रेट ब्रिटेन आणि फ्रांस ने पोलंड सोबत काही वाटाघाटी केल्या. परिणामी ब्रिटेन ने जर्मनी शी  युद्ध पुकारलं.

काही महिन्यांतच जवळ-जवळ 15 लाख पोलिश परिवारांना, साइबेरिया मधील रशियाच्या छत्र छावण्यांमध्ये श्रम करण्यासाठी स्थलांतरीत करण्यात आले. योगायोगाने 1941 च्या उन्हाळ्यात हिटलर ने रशिया वर आक्रमण केले. ज्यामुळे इतर मित्र देशांच्या मदतीने आता रशिया आणि पोलंड एकत्र येऊन जर्मनी च्या विरोधात युध्दास उभे राहिले. रशिया ला युद्धामुळे चांगलेच नुकसान सहन करावे लागले. शेवटी नाईलाजा खातीर रशिया ने पोलंड सोबत बोलणी केली आणि पोलिश सोवियत अग्रीमेंट वर सही करण्यास सहमती दर्शवली. रशिया ने आपल्या छत्र छावण्यांमध्ये कामाला जुंपलेल्या सर्व पोलिश परिवारांना बंदी मुक्त केले. त्यावेळेस साधारणतः 120,000 लोक च बाहेर पडले. या आकड्या वरून हे स्पष्ट होते कि या छावण्यांमध्ये 2 वर्षात किती लोक मारले गेले असावेत. या जिवंत बाहेर पडलेल्या जमावातुनच सर्वांत योग्य आणि सशक्त असलेल्या पोलिश स्त्री-पुरुषांची एक नवी सेना उभी केली गेली.

रशियाला युद्धात सामील असलेल्या आपल्या सैनिकांसाठी  शस्त्रे आणि अन्न पुरवणे कठीण होऊ लागले. ग्रेट ब्रिटेन ने मदतीचा हात पुढे केला. नव्या लष्कर सेनेतील एक गट इराण ला पाठवण्याची परवानगी देण्यात आली . त्या साठी ब्रिटिश सरकार ने अन्न, शस्त्रे आणि इतर युद्धोपयोगी साहित्य पुरविले.

इराण मधील पहाडी भागांतून प्रवास करत असताना या सैनिकांना रस्त्याच्या बाजूस भुकेने व्याकुळ झालेला एक तरुण युवक दिसला. सैनिकांना त्याची दया आली आणि त्यांनी आपले उरले सुरले जेवण सुद्धा त्याला देऊन टाकले. या मुला कडे एक पोतं होतं . जेव्हा सैनिकांनी ते पोतं उघडून पाहिले तर त्यात चक्क एक अस्वलाचं पिल्लू पाहून सगळे अवाक झाले. एका शिकाऱ्याने पिल्लाच्या आईला गोळी घालून मारून टाकले असल्याचे मुलाने सैनिकांना सांगितले. आणि ते अस्वलाचं पिल्लू सैनिकांना भेट दिले.

सैन्यातील पीटर नावाच्या व्यक्तीला अस्वलाचे हे छोटेसे पिल्लू अगदी स्वतःची आई च समजू लागले. सैनिकांनी त्याचे नाव वोयटेक ठेवले. वोयटेक बद्दल आणखी जाणून घेण्याची इच्छा झाली तर जी. मॉर्गन आणि W. A. Lasocki यांचे "सोल्जर बेयर" नावाचे पुस्तक नक्की वाचा.

मोंटे कैसीनो ची लढाई ही दुसऱ्या महायुध्दातील सर्वात कठीण युद्ध मानले जाते. मित्र देशांसोबत मिळून तीन वेग-वेगळ्या लढाया झाल्या पण तरीही ते पहाड जिंकू शकले नाहीत. शेवटी सात दिवसाच्या अथक लढयानंतर जनरल व्लाड्सलॉ एंडर्स [ General Wadslaw Anders ] यांच्या नेतृत्वाखाली पोलिश सेकेंड आर्मी कॉर्प ने जिंकून दाखवले. ऑक्टोबर 1946 मध्ये, वोयटेक आणि सर्व सैनिक विनफील्ड कैंप, बर्विकशायर येथे पोहोचले. नोव्हेंबर 1947 मध्ये पीटर, वोयटेक ला घेऊन एडिनबर्ग येथील प्राणी-संग्रहालयात गेला. पीटर ने वोयटेक ला पिंजऱ्यात आत पर्यंत सोडले आणि नंतर लगेच स्वतः लंडन ला निघून गेला .

वोयटेक सोळा वर्षे प्राणिसंग्रहालयात राहिला. लहान पणापासून स्वातंत्र्यात वाढलेल्या वोयटेक चे मन प्राणिसंग्रहालयात रमेल याची शक्यता खूपच कमी होती. त्या प्राणिसंग्रहालयातील प्रामुख्याने लिहिले आहे कि, " मला आज पर्यंत इतके दुःख कधीच झाले नाही जितके कि या अस्वलाकडे पाहून झाले. इतकी वर्षे स्वातंत्र्यात राहिलेल्या आणि आनंदात वाढलेल्या या अस्वलाला आता एका पिंजऱ्याआड ठेवले गेले. "

वोयटेक ची अंतिम काही वर्षे खूप वेदनेत गेली. शेवटी 2 डिसेंबर 1963 मध्ये वोयटेक ला 21 वर्ष वय असताना दया मरण देण्यात आले. त्याला एका वृद्ध सैनिकाचे वीर मरण दिले गेले, त्याला बंदुकीची गोळी मारली गेली. ग्रेट ब्रिटेन, पोलंड च्या बाजूने युद्धात उतरला. पोलिश लष्कर आणि वायू सैन्याने आमच्या सोबत मिळून हिमतीने युद्ध केले. पण दुःखद गोष्ट अशी कि, फेब्रुवारी 1945 मध्ये थकलेल्या प्रधान मंत्री चर्चिल आणि मरणोन्मुख राष्ट्रपती रूजवेल्ट यांनी स्टालिन च्या मागण्या मंजूर केल्या. आणि परिणामतः पोलंड आणि अन्य पूर्व यूरोपीय देशांना साथ देणे सोडून दिले. पण नंतर 1989 मध्ये पोलंड ने आपले स्वातंत्र्य पुन्हा मिळवले.

अंधार होता, अगदी किर्रर्र गडद असा अंधार होता.

तो गारठलेला  होता.  भुकेने व्याकुळलेला होता.

एकटा होता.



एकाने पुढं  होऊन पोतं उघडलं. आणि तेवढ्यात त्या पोत्याच्या

खोल काळोखातून चक्क एका अस्वलाचे पिल्लू बाहेर आले.

त्याने प्रेमाने सैनिकाचा हात चाटला.

सैनिकांनी अस्वलाच्या पिल्लासाठी दूध पिण्यासाठी एक बाटली तयार केली आणि त्याला पॉट भर दूध पाजले. रात्रीच्या थंडीत ऊब मिळवण्यासाठी अस्वलाचे पिल्लू सैनिकांच्या उबदार कोट मध्ये शांत झोपी गेले. सैनिकांनी त्याचे नाव वोयटेक ठेवले.



बेस कँप [base camp] वर वोयटेक ला एक खूप विचित्र आवाज ऐकू आला ... त्याने चहूकडे पाहिले... उंच एका ताडाच्या झाडावर त्याला काहीतरी हालताना दिसले. आणि तितक्यात अचानक ,

कुठलेतरी बीज वोयटेक च्या डोक्यावर येऊन टुन्नकन आदळले.

झाडावर बसलेली एक खट्याळ वानरीण वोयटेक ला बिया फेकून मारत होती.

तिचे नाव होते काशा.

ती इतकी खट्याळ होती कि वोयटेक ला चिडवायला आणि त्रास द्यायला ती एकही क्षण सोडायची नाही.



एके दिवशी , छावणी मध्ये पळत असताना वोयटेक चा पाय एका दोरीमध्ये अडकला आणि तो थेट एका मऊ वस्तू वर जाऊन आपटला. वस्तू नाही .... ते तर चक्क एक डाल्मेशियन प्रजातीचं सुंदर कुत्रं होतं. दोघांनी स्वतःला सावरलं आणि काही क्षणातच त्यांची अगदी घनिष्ट मैत्री झाली. इतकी ते जिभेने एकमेकांचे नाक चाटून आपुलकी दाखवत होते. या कुत्र्याचे नाव होते टॉमी.





सकाळी सकाळी , वोयटेक छावणी ची देखरेख करत असे. विषेषतः स्वयंपाकघराची पाहणी करायला त्याला अतिशय आवडायचे . आणि तिथल्या आचार्याचा हि  वोयटेक खूप लाडका असल्याने, त्याला देण्यासाठी त्यांच्या कडे नेहमी काही ना काही चविष्ठ पदार्थ राखून ठेवलेले असत.



वोयटेक ला सैनिकांसोबत कुस्ती खेळण्यात खूप मजा यायची.

आणि सैनिकहि अस्वलाच्या या छोट्याशा गोड पिल्लाला खुश

करण्यासाठी मुद्दाम कुस्ती चा डाव हारायचे.

सर्व सैनिकांचा वोयटेक वर खूपच जीव होता.





वोयटेक वेगवेगळ्या लष्करी ठिकाणांवर युद्धपयोगी सामग्री आणि उपकरणे पोहचवण्यासाठी सैनिकांसोबत प्रवास करायचा. त्याला सैनिकांसोबत पाहून बरेच वाटसरू आश्चर्याने तोंडात बोट घालून बघत च राहायचे .

वोयटेकला जीप किंवा ट्रक च्या पुढच्या सीट वर बसायला खूपच आवडायचे.



हळू-हळू वोयटेक मोठा होऊ लागला. तो चांगलाच धिप्पाड आणि ताकदवान दिसू लागला होता. आता तो अगदी सहज पणे सैनिकांना कुस्तीच्या डावात हरवत असे, ते हि स्वबळावर !

कधी कधी तर तो सैनिकांना उलटे करून त्यांचे खिसे पण रिकामे करत असे.






शेवटी तो दिवस आलाच आणि वोयटेक ला सैनिकांसोबत इटली ला पाठवण्यात आले. पण समुद्री मार्गाने इजिप्त मधून प्रवास करत असताना तो खूप आजारी पडला. आणि मग ते इटली मध्यल्या टोरंटो नामक शहरात उतरले.

वोयटेक आणि त्याच्यासोबतचे लष्कर सैनिक, युद्धभूमीवर लढणाऱ्या सैनिकांना गोळा-बारूद आणि इतर युद्धोपयोगी सामान पोहचवत असत. कधी-कधी वोयटेक असलेल्या ट्रक वर पण जर्मन वायुसेनेचा हमला झाला.






वोयटेक, सैनिकांना अवजड सामान , गोळा-बारूद आणि इतर उपकरणे ट्रक मधून उत्तरवायला मदत करायचा.  ते अतिशय कठीण काम होते. पण वोयटेक ते अगदी सहज करायचा. सैनिक त्याला आश्चर्य आणि कौतुकाच्या नजरेने पाहत राहायचे.



वोयटेकच्या कामाने सैनिक खूप भारावून गेले. आणि लवकरच सेनेतील उच्च पदावरील ऑफीसरांनी पण त्याच्या योगदानाची दाद घेत, आपल्या कंपनी बैज [company badges] वर गाडीच्या स्टीयरिंग व्हील मध्ये गोळा-बारूद घेऊन उभ्या वोयटेकला दाखवले गेले.





लवकरच युद्ध संपले आणि वोयटेक सैनिकांसोबत ग्लासगो ला रवाना झाला.

युद्ध सैनिक आणि त्यांचा लाडका पराक्रमी, वोयटेक ला पाहण्यासाठी आणि त्याचे अभिनंदन करण्यासाठी हजारों नागरिक रांगेमध्ये रस्त्यावर उभे होते.

वोयटेक आणि सैनिक स्कॉटलैंड मध्ये बर्विक-ऑन-ट्वीड नावाच्या शहर जवळील एका छावणीमध्ये रहात होते. पण आता सैनिकांची, लष्कर सोडून आपल्या परिजनांकडे परतण्याची आणि नवी नोकरी शोधण्याची वेळ आली होती.  त्यामुळे वोयटेक खूप उदास होता.

तो आता कुठे राहणार ?

कुणासोबत राहणार ?





वोयटेक चे सगळे मित्र आप-आपल्या घरी परतणार होते आणि त्यांचा कॅम्प कायम स्वरूपी बंद होत होता. तो आता कुठे जाऊ शकणार ?





एडिनबर्ग मधल्या एका प्राणिसंग्रहालयाने वोयटेक ला त्यांच्या कडे निवारा देण्यास पुढाकार घेतला. तिथेय राहून वोयटेक ला अन्न आणि मित्र बनवण्याची संधी मिळणार होती.

वोयटेक आपल्या नवीन घरा बद्दल खूप उत्सुक होता. तिथे मिळालेल्या त्याच्या आसनावर बसून तोच खूप खुश व्हायचा. वोयटेक इतका लोकप्रिय झाला कि विशेषतः त्याला पाहण्यासाठी लोक हजारोंच्या संख्येने भेट देत असत. पुढची 16 वर्षं वोयटेक तिथेच प्राणिसंग्रहालयात राहिला. वयाच्या 21 व्या वर्षी त्याने देह सोडला.










वोयटेकच्या कितीतरी आठवणी अजूनही त्या सर्व लोकांच्या मनात घर करून आहेत, जे त्याला भेटले होते. या अप्रतिम आणि असाधारण अस्वलाच्या स्मरणार्थ लंडन आणि ओटावा मध्ये त्याची अनेक स्मारकं ही उभारली गेली.